**सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत सर्व शासकीय वसतिगृहांच्या भोजन ठेक्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१५/प्र.क्र.१४८/शिक्षण-२**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ३१ ऑगस्ट, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांक:- बीसीएच-२०१०/प्र.क्र.४३०/मावक-४, दि.२६ जुलै, २०११

२) शासन आदेश क्रमांक:- बीसीएच-२०१३/प्र.क्र.१२४/शिक्षण-२, दि.२० सप्टेबर,२०१३

**प्रस्तावना -**

राज्यात मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी एकूण ३८१ शासकीय वसतिगृहे कार्यरत आहेत. सदर शासकीय वसतिगृहांतील प्रवेशित विद्यार्थ्यांना भोजन पुरविण्यासाठी यापूर्वी जिल्हास्तरावर पारंपारिक पध्दतीने निविदा मागविण्यात येऊन संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांचेमार्फत त्या अंतिम करण्यात येत होत्या. तथापि, प्रत्येक जिल्ह्यातील भोजन ठेक्यांच्या दरात भिन्नता असल्याने विद्यार्थ्यांना नियमित भोजन देण्यात अडचणी निर्माण होत असत. यास्तव, शासन निर्णय दि.२० सप्टेबर २०१३ अन्वये प्रादेशिक स्तरावर ई-निविदा राबविण्याचा निर्णय घेण्यात आला. याद्वारे, जिल्हा व विभागीय स्तरावरील वसतिगृहांकरिता एकाच दिवशी ई-निविदा प्रसिध्द करण्यात येऊन त्यांना आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांचे शिफारशीने शासन स्तरावर अंतिम मान्यता देण्याची प्रक्रिया अवलंबिण्यात आली. तथापि, सदर ई-निविदा प्रक्रियेतील भोजन ठेक्यांचे वाटपातील अडचणी, यांसदर्भात न्यायालयात दाखल झालेल्या याचिका व त्यांचा विद्यार्थ्यांना नियमित भोजन मिळण्याबाबत होणाऱ्या असुविधांचा विचार करता सदर ई-निविदा प्रक्रियेत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय —**

सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत असलेल्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या सर्व शासकीय वसतिगृहांना भोजन पुरवठा करण्यासाठी सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून भोजन ठेके ठरविणेबाबत खालीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबण्याचा निर्णय घेण्यात आला आहे:-

१. मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या सर्व शासकीय वसतिगृहांना भोजन पुरवठा करण्यासाठी भोजन ठेके ठरविणेबाबत राज्यात एकसमान ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२. प्रत्येक विभागातील सर्व जिल्ह्याच्या संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी आपापल्या जिल्ह्यातील सर्व शासकीय वसतिगृहांकरिता एकच ई-निविदा प्रसिध्द करावी. तथापि, ज्या जिल्ह्यांच्या ठिकाणी विभागीय स्तरावरील वसतिगृहे कार्यरत आहेत, त्या ठिकाणी

संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी विभागीय स्तरावरील वसतिगृहांसाठी स्वतंत्र ई-निविदा प्रसिध्द करावी. याबाबत, आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी या शासन निर्णयातील मुद्दा क्र. ६, ७ व ८ च्या अनुषंगाने एकसमान ई-निविदेचे प्रारुप तयार करुन ते सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना उपलब्ध करुन द्यावे.

३. संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांचे उपस्थितीत विभागातील सर्व जिल्हानिहाय व विभागीय स्तरावरील वसतिगृहांसाठी ई-निविदा एकाच दिवशी उघडण्यात याव्यात.

४. संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांनी ई-निविदा प्रक्रियेची संपूर्ण कार्यवाही विहीत मुदतीत पूर्ण करावी, व त्याबाबतचा स्वयंस्पष्ट अहवाल आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेकडे पाठवावा.

५. संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांचेकडून प्राप्त अहवालांनुसार पात्र ठेकेदार निवडीसाठी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| (१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे | - अध्यक्ष |
| (२) अतिरिक्त आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे | - सदस्य |
| (३) सह आयुक्त (शिक्षण), समाजकल्याण, आयुक्तालय, पुणे | - सदस्य |
| (४) उपायुक्त (वित्त), समाजकल्याण आयुक्तालय, पुणे | - सदस्य |
| (५) संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग | - सदस्य सचिव |

सदर समिती निविदा प्रक्रियेत गुणात्मकदृष्ट्या पात्र ठरलेल्या व सर्वात कमी दर असलेल्या भोजन ठेकेदार/ संस्था यांची निवड करुन त्यांना अंतिम मान्यता देण्याबाबत शासनास शिफारस करतील.

६. जर जिल्ह्यातील शासकीय वसतिगृहांची संख्या ४ पेक्षा जास्त असेल, तर जिल्ह्यातील शासकीय वसतिगृहांची एकूण संख्या विचारात घेता पात्र व सर्वात कमी दर असलेल्या भोजन ठेकेदार/ संस्था यांना जास्तीत जास्त ४ शासकीय वसतिगृहांचा भोजन ठेका देण्यात यावा.

७. तथापि, जिल्ह्यातील उर्वरीत शासकीय वसतिगृहांच्या भोजन ठेक्याबाबत उपरोक्त मुद्दाक्र.६ च्या अधीन राहून दुसरा/ तिसरा/ चौथा भोजन ठेकेदार निवडीबाबत आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांचे अध्यक्षतेखालील समितीने निर्णय घ्यावा. मात्र, सदर ठेकेदारांस निविदेतील सर्वात कमी ठरलेल्या दराने भोजनपुरवठा करणे बंधनकारक राहील. याबाबत, संबंधित भोजन ठेकेदाराकडून सहमतीपत्र घेण्यात यावे.

८. जर, जिल्ह्यातील उर्वरीत शासकीय वसतिगृहांच्या प्रमाणात दुसरा/तिसरा/चौथा भोजन ठेकेदार उपलब्ध न झाल्यास किंवा त्याने सर्वात कमी ठरलेल्या दराने भोजनपुरवठा करण्यास

नकार दिला तर सदर उर्वरीत शासकीय वसतिगृहांचे भोजन ठेके पात्र ठरलेल्या उर्वरीत भोजन ठेकेदार/संस्था यांमध्ये समप्रमाणात विभागून देण्यात यावे.

९. जर सर्वात कमी दर असलेल्या एकापेक्षा अधिक निविदा प्राप्त झालेल्या असतील तर, सदर प्रकरणी भोजन ठेकेदार/संस्था निवड करतांना अनुसूचित जाती सहकारी संस्था, महिला बचत गट व बेरोजगार सहकारी संस्था यांना प्राधान्य देण्यात यावे.

१०. विभागीय स्तरावरील शासकीय वसतिगृहांना भोजन पुरवठा करण्यासाठी मागविण्यात आलेल्या निविदांमधून पात्र भोजन ठेकेदार/संस्था निवडीबाबतही उपरोक्तप्रमाणे कार्यवाही आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे अध्यक्षतेखालील समितीने करावी.

११. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे अध्यक्षतेखालील समितीने भोजन ठेकेदार/संस्था निवडीची कार्यवाही १५ दिवसांचे आत पूर्ण करुन त्यांस अंतिम मान्यता आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे स्तरावर देण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८३११७०६५६०४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap P Lubal

Digitally signed by Pratap P Lubal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap P Lubal
Date: 2015.09.01 11:25:30 +05'30'

(प्र.पां.लुबाळ)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
५) मा.प्रधान सचिव (सा.न्या.)
६) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) अतिरिक्त आयुक्त, समाजकल्याण, आयुक्तालय, पुणे
८) सह आयुक्त (शिक्षण), समाजकल्याण, पुणे
९) उपायुक्त (वित्त), समाजकल्याण, पुणे
१०) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
११) सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
१२) निवड नस्ती.